**विदर्भातील गोंदीया, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर, नागपूर या विदर्भातील जिल्ह्यातील प्रकल्पासाठी पाणी उपलब्धता प्रमाणपत्र देण्याचे अधिकार मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक यांना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्र.पाउप्र-२०२०/(१९४/२०२०)/जसंअ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ११ नोव्हेंबर २०२०

संदर्भ: १. शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००२ /(१७/०२)/जसंअ, दि.२४ डिसेंबर २००३
२. शासन परिपत्रक क्र.पाउप्र २०१२ /१३७ /(७१/२०१२)/जसंअ, दि.१९ जुलै २०१३

**परिपत्रक :**

शासनाच्या वरील संदर्भीय परिपत्रक क्र. २ नुसार विपुल पाणी उपलब्धतेच्या खोऱ्यात पाणी उपलब्धता प्रमाणपत्राबाबतची कार्यप्रणाली सुलभ, सुटसुटीत व जलदगतीने होण्यासाठी प्रकल्प अहवाल तयार करण्याच्या अनुषंगाने पाणी उपलब्धता प्रमाणपत्र देण्याचे अधिकार विदर्भातील गोंदीया, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर व नागपूर या जिल्ह्यातील प्रकल्पासाठी मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांना अस्तित्वातील /बांधकामाधीन प्रकल्पांच्या नियोजनावर परिणाम होणार नाही या मर्यादेत प्रदान केले होते.

पाण्याचा हिशोब व सर्व नद्यांचे जललेखा अद्ययावत करण्याचे काम तसेच एकात्मिक राज्य जल आराखडयानुसार जललेखे सुधारीत करून प्रत्येक उपखोरेनिहाय प्रमाणित पाण्याचा हिशोब नव्याने मांडणे व तो राखणे हे मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक यांचेतर्फे करणेत येत असलेने व पाणी उपलब्धता प्रमाणपत्र देण्याचे कार्यात एकसूत्रता येण्याच्या दृष्टीने आता शासनाने विदर्भातील गोंदीया, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर, नागपूर या जिल्ह्यातील प्रकल्पासाठी पाणी उपलब्धता प्रमाणपत्र देण्याचे अधिकार पुन:श्च मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक यांचेकडे सोपविण्याचे ठरविले आहे.

त्यामुळे यापुढे विदर्भातील गोंदीया, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर, नागपूर या जिल्ह्यातील प्रकल्पासाठी पाणी उपलब्धता प्रमाणपत्र मिळविण्यासाठी आवश्यक ती माहिती मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांना सादर करण्याऐवजी मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक यांचेकडे सादर करून त्यांच्याकडून पाणी उपलब्धता प्रमाणपत्र प्राप्त करावे.

तसेच मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांनी संदर्भीय परिपत्रक क्र. २ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार ज्या योजनांना पाणी उपलब्धता प्रमाणपत्र देण्यात आली आहेत, त्या सर्वांची कागदपत्रे मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक यांना हस्तांतरित करावीत.

संदर्भित परिपत्रकातील इतर तरतुदी अबाधित राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११११४५१२७०२७ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajnish Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, serialNumber=293016b5f13cd03f75c9f34c66d956309c8b3cd5faf07931d817577e6116e436, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2020.11.11 11:49:02 +05'30'

**(र.रा.शुक्ला)**
**अधीक्षक अभियंता व उप सचिव**
**जलसंपदा विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य अभियंता (जसं) व सस, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर
८. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
९. उप सचिव ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.उप सचिव, मोप्र-१/मोप्र-२/लपा, जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई
११.ग्राम विकास व जल संधारण विभाग, कार्यासन जल-१,मंत्रालय, मुंबई
१२.जसंअ कार्यासन संग्रहार्थ